पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या विद्यार्थी जागांचा प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी राज्यात नव्याने निर्माण करण्यात आलेल्या व विद्यमान शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/ केंद्रामधील वाढीव तुकडयांकरीता मंजूर करण्यात आलेली १३२ पदे व शासकीय तांत्रिक विद्यालय, मुलुंड येथील श्रेणीवाढ करण्यात आलेले १ पद अशा एकूण योजनांतर्गत १३३ अस्थायी पदांना दिनांक ०१/०६/२०१८ ते दिनांक ३०/९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अपमु-२०१८/प्र.क्र.४५ /व्यशि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१८

**संदर्भ :**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ४/ आस्था-३/मुदतवाढ/२०१७/(१६/२६)/७७१, दिनांक २०/०५/२०१८.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.व्हीओसी-२००९/प्र.क्र.१४/०९/व्यशि-४, दि. ४/५/२०११.

३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.दिनांक ०५/०३/२०१८

४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्र. अपमु-२०१८/प्र. क्र.४५/व्यशि-४ दिनांक ३१/०३/२०१८

**प्रस्तावना :**

पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या विद्यार्थी जागांचा प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी राज्यात नव्याने निर्माण करण्यात आलेल्या व विद्यमान शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रामधील वाढीव तुकडयांकरीता १३२ पदे नियमित वेतनश्रेणी निर्माण करण्यास तसेच शासकीय तांत्रिक विद्यालय, मुलुंड या संस्थेतील मुख्याध्यापक (गट-ब) या पदाची श्रेणीवाढ करण्यास शासन निर्णय दि. ०४/५/२०११ अन्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर १३३ योजनांतर्गत अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०१२ पासुन आतापर्यत दिनांक ३१/०५/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. शासकीय तंत्र माध्यमिक शाळा / केद्रांमधील सदर तुकडया पुढे चालू ठेवण्याच्या दृष्टिने, योजनांतर्गत एकूण १३३ अस्थायी पदांना वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र. क्र. ८/१६/आ.पु.क. , दिनांक ०५/०३/२०१८ च्या शासन निर्णयानुसार दिनांक ०१/०६/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यन्त मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या विद्यार्थी जागांचा प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी राज्यात नव्याने निर्माण करण्यात आलेल्या व विद्यमान शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रामधील वाढीव तुकडयांकरीता मंजूर करण्यात आलेल्या खालील १३२ पदे व शासकीय तांत्रिक विद्यालय, मुलुंड येथील श्रेणीवाढ करण्यात आलेले १ पद अशी एकूण योजनांतर्गत १३३ पदांना दिनांक ०१/०६/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पदनांम | ६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| | | वेतन बॅड | ग्रेड वेतन | |
| १) | मुख्याध्यापक (गट-अ) | ९३००-३४८०० | ५४०० | १ |
| २) | मुख्याध्यापक (गट-ब) | ९३००-३४८०० | ४८०० | ८ |
| **गट-क** | | | | |
| ३) | सहायक अधिव्याख्याता | ९३००-३४८०० | ४३०० | ३७ |
| ४) | निदेशक (पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम) | ५२००-२०२०० | २८०० | ७१ |
| ५) | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० | १९०० | ८ |
| ६) | भांडार लिपिक | ५२००-२०२०० | १९०० | ८ |
| | **एकूण** | | | **१३३** |

२. **<u>अटी व शर्ती</u> :-**

१) ज्या प्रयोजनासाठी उपरोक्त पदे निर्माण करण्यात आली आहेत, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करण्यात यावा.

२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा किंवा त्यापेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त नाही, याची खातरजमा करावी.

३) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास, तसेच सुधारीत आढाव्यास (नव्याने निर्माण केलेली पदे आकृतीबंधात समाविष्ट करुन) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. या प्रस्तावावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व याबाबत होणारा खर्च सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षामध्ये मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**वेतन व इतर अनुषंगिक भत्ते मागणी क्रमांक : झेड ए-१, २२०३ तंत्र शिक्षण, ००३ प्रशिक्षण, (०१) शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, (०१) (०५) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत विविध योजनांसाठी पद निर्माण करणे, राज्य योजनांतर्गत योजना (२२०३ ३५१३) ०१.**

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०५/०३/२०१८ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०२१२०२५०८४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2018.07.02 12:04:37 +05'30'

**( संतोष वि. रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१.
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनायामार्फत)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालये (संचालनायांमार्फत)
८) मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा /केंद्र तथा कनिष्ठ महाविद्यालये / प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, ( सर्व संचालनालयांमार्फत)
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( संचालनालयांमार्फत)
१०) उपसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर (संचालनालयामार्फत)
११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागर कार्यालय (संचालनालयामार्फत)
१२) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यशि-१, व्यशि-२, व्यशि-३, )
१५) निवड नस्ती.